वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभागाच्या अधिपत्याखालील सर्व शासकीय वैद्यकीय महाविद्यालये व रूग्णालये येथील हॉस्पीटल मॅनेजमेंट इन्फॉर्मेशन सिस्टिम (एच. एम. आय. एस.) हा प्रकल्प महाराष्ट्र माहिती व तंत्रज्ञान महामंडळामार्फत (MahaIT) राबविण्यास मान्यता देण्याबाबत.

# महाराष्ट्र शासन

**वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः वैशिवि-२०१८/प्र.क्र. ३२१ /प्रशासन-२**

९ वा मजला, नवीन गोकुळदास तेजपाल रूग्णालय संकुल,
लोकमान्य टिळक मार्ग, नवीन मंत्रालय, मुंबई - ४०० ००१.
तारीख: ०२ नोव्हेंबर, २०१९.

**संदर्भ:-**

१) शा.नि., सामान्य प्रशासन विभाग, क्र.सीओएम-१०१८/प्र.क्र.२१२/९८/३९, दिनांक ०५ ऑक्टोबर, २००१.

२) शा.नि.वै.शि.वऔ.द्र.वि.क्र.ईएसटी/२४०३/३५५८/प्र.क्र.०७/आस्थापना/सं.कं.नि./०६, दिनांक १३ जुलै, २००६.

३) शा.नि.वै.शि.व औ.द्र.वि. एचएमआयएस-२०११/सीआर-१/प्रशा-२, दिनांक २१ मार्च, २०१२.

४) शा.नि.वै.शि.व औ.द्र.वि. क्र. एचएमआय-२०१५/प्र.क्र.३०४/प्रशा-२, दिनांक २५ फेब्रुवारी, २०१६.

५) शासन निर्णय, वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग, क्रमांक एच.एम.आय.-२०१६/प्र.क्र.१६२/प्रशासन-२, दिनांक २७ एप्रिल, २०१६.

६) सामान्य प्रशासन (माहिती व तंत्रज्ञान) विभाग, शासन निर्णय क्र. मातंसं-१७१६/प्र.क्र.२८६/३९, दिनांक ०९ ऑगस्ट, २०१६.

७) शा.नि.वै.शि.व औ.द्र.वि. क्र. पीआयएल-२०१७/प्र.क्र.४०१/प्रशा-२, दिनांक २० सप्टेंबर, २०१७.

८) मा. मुख्य सचिव यांच्याअध्यक्षतेखाली दिनांक ११.०९.२०१९ रोजी पार पडलेल्या उच्चाधिकार समितीच्या बैठकीचे इतिवृत्त

**प्रस्तावना:**

राज्यातील शासकीय वैद्यकीय महाविद्यालये व संलग्नित रूग्णालयामधील प्रशासन अधिक गतीमान, लोकाभिमुख, पारदर्शक व लोककल्याणकारी करणे, शासकीय वैद्यकीय महाविद्यालयातील सर्व शैक्षणिक बाबींमध्ये तसेच सर्व कामकाजामध्ये माहिती तंत्रज्ञानाचा वापर करुन इलेक्ट्रॉनिक मेडिकल रेकॉर्ड निर्माण करण्याच्या दृष्टीने दिनांक १३.०७.२००६ च्या शासन निर्णयान्वये मे.हेवलेट पॅकर्ड इंडिया सेल्स प्रा.लि. यांच्या सोबत करार (Master Service Agreement-MSA) करून हॉस्पीटल मॅनेजमेंट इन्फॉर्मेशन

सिस्टिम (एच.एम.आय.एस.) प्रकल्प सुरू करण्यास मान्यता देण्यात आली होती. सदर प्रकल्पांतर्गत /व्यवस्थेंतर्गत बाह्यरुग्ण, आंतररुग्ण नोंदणी तसेच, विद्यार्थी नोंदणी इत्यादी सेवा पुरवल्या जातात. प्रकल्पाचा कालावधी शासन निर्णय दिनांक १३.०७.२००६ नुसार ८ वर्षांसाठी निश्चित करण्यात आला होता. सदर प्रकल्पास वेळोवेळी मुदतवाढ देण्यात आली आहे. सदर प्रकल्पाच्या सेवा पुरवठादारास शासनामार्फत दिनांक १०.०६.२०१९ रोजी याबाबतची Exit Notice देण्यात आली आहे. सदर हॉस्पीटल मॅनेजमेंट इन्फॉर्मेशन सिस्टिम (एच. एम. आय. एस.) प्रकल्प महाराष्ट्र माहिती व तंत्रज्ञान महामंडळामार्फत (MahaIT) राबविण्याचे शासनाच्या विचाराधीन होते. त्यानुसार सदर प्रस्ताव शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, दिनांक ०५.१०.२००१ अन्वये गठित मा. मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखालील उच्चाधिकार समितीच्या दिनांक ११.०९.२०१९ रोजी झालेल्या बैठकीत सादर करण्यात होता. त्यास मान्यता प्राप्त झाली आहे. या अनुषंगाने पुढीलप्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे.

**शासन निर्णय :-**

मा. मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखालील दिनांक ११.०९.२०१९ रोजी झालेल्या उच्चाधिकार समितीच्या बैठकीच्या अनुषंगाने निर्गमित इतिवृत्तातील निर्देशानुसार वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभागाच्या अधिपत्याखालील शासकीय वैद्यकीय महाविद्यालये व रूग्णालये येथे हॉस्पीटल मॅनेजमेंट इन्फॉर्मेशन सिस्टिम (एच. एम. आय. एस.) हा रुपये ५१३,४३,११,१३५ (रुपये पाचशे तेरा कोटी त्रेचाळीस लाख अकरा हजार एकशे पस्तीस फक्त ) इतक्या अंदाजित खर्चाचा प्रकल्प महाराष्ट्र माहिती व तंत्रज्ञान महामंडळामार्फत (MahaIT) राबविण्यास सदर शासन निर्णयाद्वारे प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे. प्रकल्पात समाविष्ट बाब निहाय खर्च खालीलप्रमाणे आहे.

| अ.क्र. | बाब (Particular) | भांडवली खर्च (CAPEX ) | परिचालन खर्च (OPEX) |
|---|---|---|---|
| १ | आय. टी. हार्डवेअर (IT Hardware) | १३४,४९,४९,३३१ | ९१,०६,५५,९०५ |
| २ | सॉफ्टवेअर ( Software ) | ५६,५०,००,००० | ९,४०,००,००० |
| ३ | हेल्पडेस्क ॲण्ड कॉलसेंटर सेट अप ॲण्ड ट्रेनिंग (Helpdesk & Call Centre Setup and Training) | २,९७,५०,००० | ६,८०,५०,००० |
| ४ | मॅनपावर डिप्लॉयमेंट ( Manpower Deployment) | - | १३२,२७,३०,९६६ |
| ५ | प्रकल्पाच्या संबधित स्थल व टप्पापरत्वे येणारा अन्य खर्च (Any other project related cost at respective Locations in that Phase) | २३,१५,५०,००० | ३,४६,००,००० |

| | | | |
|---|---|---|---|
| ६ | प्रकल्प व्यवस्थापन कार्यालय (PMO) | - | ३१,५९,००,००० |
| Total Capex and Opex separately | | २१७,१२,४९,३३१ | २७४,५९,३६,८७१ |
| Total Project Value | | | ४९१,७१,८६,२०२ |
| स्टेशनरी, कार्टेज, डिझेल, प्लास्टीक कार्ड, एसएमएस गेट वे, विद्युत देयके,इत्यादी अनावर्ती खर्चाच्या१० टक्के (Consumables १०% of Capex for Paper, Cartridge, Diesel, Plastic Cards, SMS Gateway, Electricity Bills etc.) | | | २१,७१,२४,९३३ |
| प्रकल्पाची किंमत (पाच वर्षाच्या उपभोग्यबाबींसह) Project Total with Consumables for ५ years | | | ५१३,४३,११,१३५ |

२. सदर प्रकल्प कार्यान्वित करण्यासाठी / राबविण्यासाठी आवश्यकतेनुसार वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभागाशी समन्वय साधून निर्णय घेण्यास महाराष्ट्र माहिती व तंत्रज्ञान महामंडळास (MahaIT) प्राधिकृत करण्यात येत आहे.

३. वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभागाच्या वतीने संचालक, वैद्यकीय शिक्षण व संशोधन, मुंबई आणि प्रकल्प समन्वयक (एच. एम. आय. एस.) यांनी सदर प्रकल्पात समाविष्ट प्रणालीचा डॉक्टरांमार्फत तसेच भांडार व्यवस्थापनात प्रभावीपणे वापर / उपयोग होत आहे, याबाबतची खातरजमा करावी.

४. सदर प्रकल्पासाठी लागणारा आवश्यक निधी खालील लेखाशिर्षातंर्गत उपलब्ध निधीतून करण्यात येईल.

मागणी क्रमांक - एस-०१

| | | |
|---|---|---|
| २२१० | - | वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य |
| ०१ | - | नागरी आरोग्य सेवा-विषमचिकित्सा राज्य योजनांतर्गत योजना |
| (००)(०९) | - | वैद्यकीय महाविद्यालये व संलग्न रूग्णालयात आरोग्य सेवा व शैक्षणिक व्यवस्थापन आणि माहिती यंत्रणा राबविणे (२२१० - डी - ९६२ ) |
| ३० | | इतर कंत्राटी सेवा |

५. सदर प्रकल्पाबाबत आवश्यकतेनुसार शासन निर्णय / आदेश वेळोवेळी स्वतंत्रपणे निर्गमित करण्यात येतील.

६. सदर शासन निर्णय मा.मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखाली दिनांक ११.०९.२०१९ रोजी पार पडलेल्या उच्चाधिकार समितीच्या बैठकीच्या इतिवृत्तातील निर्देशानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक क्रमांक २०१९११०५१६५०५९०३१३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Prakash Babanrao Surwase

Digitally signed by Prakash Babanrao Surwase
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Medical Education and Drugs Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=eb1adbd5d5d31cf6d91c86149c955a6822b4fea3e4ec334c18e2c6f96cc5301b, cn=Prakash Babanrao Surwase
Date: 2019.11.06 11:03:33 +05'30'

(प्रकाश सुरवसे)
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मुंबई
२. अपर मुख्य सचिव (वित्त) विभाग, मंत्रालय, मुंबई
३. अपर मुख्य सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
४. प्रधान सचिव, महसूल विभाग, मंत्रालय, मुंबई
५. प्रधान सचिव, सामान्य प्रशासन (माहिती व तंत्रज्ञान) विभाग, मंत्रालय, मुंबई
६. प्रधान सचिव, सामान्य प्रशासन (र. व का.) विभाग, मंत्रालय, मुंबई
७. सचिव,विधानमंडळ सचिवालय, मुंबई
८. विकास आयुक्त (उद्योग), उद्योग संचालनालय, मुंबई
९. महासंचालक, National Informatic Centre, दिल्ली.
१०. संचालक, National Centre for Software Technology
११. संचालक, महाराष्ट्र माहिती व तंत्रज्ञान (MahaIT), मुंबई
१२. मा. मंत्री (वै.शि.) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
१३. मा.राज्यमंत्री (वै.शि.) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
१४. संचालक, वैद्यकीय शिक्षण व संशोधन, मुंबई.
१५. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) - १, महाराष्ट्र, मुंबई
१६. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
१७. निवासी लेखा अधिकारी, मुंबई
१८. प्रकल्प समन्वयक, (एचएमआयएस प्रकल्प), संचालनालय, वैद्यकीय शिक्षण व संशोधन, मुंबई
१९. सर्व अधिष्ठाता, शासकीय वैद्यकीय / दंत महाविद्यालये व संलग्नित रूग्णालये
२०. अवर सचिव, (अलेप), वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग, मंत्रालय, मुंबई
२१. नियोजन विभाग(१४७५), मंत्रालय, मुंबई
२२. वित्त विभाग (व्यय-१३/अर्थ-९), मंत्रालय, मुंबई
२३. मे. EIT Services India Pvt. Ltd., बेंगलोर
२४. सर्व प्रशासकीय विभाग, मंत्रालय, मुंबई
२५. निवडनस्ती (प्रशासन-२)